सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२४/प्र.क्र. ३२/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ३ जुलै, २०२४

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१६/१९१/२०२४-२५, दि. ११.०६.२०२४.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्याला ७२० कि.मी. लांबीचा समुद्र किनारा लाभलेला आहे. दरवर्षी पावसाळ्यात समुद्राच्या पाण्याच्या लाटांमुळे किंवा भरतीच्यावेळी येत असलेल्या उधानामुळे समुद्र किनाऱ्याजवळील वालुकामय क्षेत्राची बऱ्याच मोठ्या प्रमाणावर धूप होते व वाळू वाहून जाते. वाळू वाहून गेल्याने जास्त भरती आल्यास समुद्र किनाऱ्यालगतची घरे, वाड्या, नारळ व पोफळीच्या बागा तसेच काठावरील भूभागाची मोठ्या प्रमाणावर धूप होऊन, मोठ्या प्रमाणावर आर्थिक नुकसानीची झळ प्रत्येक वर्षी समुद्र किनाऱ्यावरील गावांना लागत असते. या सर्व बाबी लक्षात घेऊन समुद्र किनाऱ्यावरील धूप कमी करण्यासाठी समुद्र किनारी सुरू प्रजातीची लागवड करणे, त्सुनामी सारख्या लाटांची तीव्रता कमी करून जीवित व मालमत्तेचे आर्थिक नुकसान टाळणे, सुरू प्रजातीची वने तयार करून पर्यटकांना आकर्षित करणे, ग्रामपंचायतीच्या उत्पन्नात वाढ करणे व ग्रामीण भागात रोजगाराच्या संधी निर्माण करणे ही या योजनेची उद्दिष्टे आहेत.

०२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक ०१.०४.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तिय वर्ष सन २०२४-२५ करिता एप्रिल ते जुलै, २०२४ पर्यंतची मासिक विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा निधी (लेखानुदान) वितरीत करण्याबाबत सुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तसेच निधी वितरीत करतांना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात असे सुचित करण्यात आले आहे.

०३. सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४) या योजनेंतर्गत ३३-अर्थसहाय्य या सविस्तर शिर्षांतर्गत रु. ५१.०० लक्ष निधी मंजूर व अर्थसंकल्पित आहे.

०४. सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता राज्यस्तरीय योजनेंतर्गत वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४) या योजनेंतर्गत बांधील कामांतर्गत चालू बाब प्रस्ताव शासनास सादर करण्यात आले आहेत. त्यानुसार ५.५० **हे.आर.** क्षेत्रावर तृतीय वर्षीय कामांकरिता एकूण रु. ८.९६ लक्ष रकमेचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून प्राप्त झाला असून, सन २०२४-२५ करीता मंजूर नियतव्ययाच्या अनुषंगाने अनुदान उपलब्ध करुन देण्याची विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार या कामांसाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता "वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६ ८६०४)" या योजनेंतर्गत ३३-अर्थसहाय्य या उद्दिष्टांकरीता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या एकूण रु.५१.०० लक्ष तरतुदीपैकी सन २०२४-२५ या वर्षात अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ) अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी दिनांक ११.०६.२०२४ रोजीच्या पत्रान्वये मागणी केलेल्या एकूण ५.५० हे. क्षेत्रावर करण्यात आलेल्या तृतीय वर्षीय कामांकरीता रु.८.९६ लक्ष निधीच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण )२४०६ ८६०४ | | | | | (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | वृत्त | विभाग | कामाची बाब | क्षेत्र हेक्टर आर. | या शासन निर्णयाद्वारे वितरित करावयाच्या निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | **ठाणे** | ठाणे | **तृतीय वर्ष कामे** | २.०० | ३.२६ |
| | | रायगड | | ३.५० | ५.७० |
| **एकूण एकंदर** | | | | **५.५०** | **८.९६** |

२. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार, विहीत अटी व शर्तीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर हे वर्ष २०२४-२५ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२४-२५ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजनेंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**

**२४०६, वनीकरण व वन्यजीवन,**

**वनीकरण, १०२ सामाजिक क्षेत्रीय वनीकरण**

**(०३) वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४)**

**३३-अर्थसहाय्य**

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दिनांक ०१.०४.२०२४ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०३१३०३०७६३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2024.07.03 13:18:22 +05'30'

**( वि. बा. इंगळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.

१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई

११. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२

१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५. निवडनस्ती फ-११.